सारखें आहे. एक इषारा म्हणून त्याचा उपयोग होईल पण नमुना म्हणून होणार नाहीं !

'व्हेन् वुइ डेड् अवेकन्' वरील टीकाही अशीच दोषयुक्त आहे. या आपल्या शेवटच्या नाटकांत कलास्फूर्ति ही कलावंताला कशी घातक ठरते हें इब्सेननें दाखविलें असून थॉमस मॅनच्या 'डेथ् इन् व्हेनिस' अथवा 'टोनिओ क्रोगर' ( Tonio Kroger ) या नाटकाच्या जातींतील हें नाटक आहे. थॉमस मॅननें दाखविलें आहे कीं कलासक्ति ही इतर मादक पेयाप्रमाणेंच क्षयकारक असून कलावंताला पूर्णत्वाला पोंचण्यासाठीं स्वतः नाहींसेंच व्हावें लागतें. 'व्हेन् वुइ डेड् अवेकन्' मध्यें कला ही किती जुलमी आहे हें इब्सेन दाखवितो. मात्र हा जुलूम कलावंतापेक्षां त्याच्याकडे 'नमुना' ( Model ) म्हणून काम करणाऱ्यालाच अधिक सहन करावा लागतो. परंतु नाटकाचें हें सार शॉना कळत नाहीं आणि संबंध नाटक म्हणजे कौटुंबिक प्रश्नावर ( Domestic – Civilization ) लिहिलेला एक निबंधच आहे असें त्यांना वाटतें. रूबेक आणि आयरीन ( Irene ) हीं प्रिया आणि प्रियकर नाहींत ( शॉ स्वतः हें कबूल करतातच ) आणि म्हणून रूबेक आणि आयरीन यांचे संबंध, रूबेक आणि त्याची पत्नी यांच्यांतील संबंधांप्रमाणें नाहींत. हें खरें आहे कीं, आपण निःसंकोचपणें आपलें सर्व सौंदर्य संपूर्ण अनावृत असें रूबेकपुढें उघड करीत असतां तो कधींही आपल्याला स्पर्श करीत नाहीं हीच आयरीनाची प्रमुख तक्रार आहे. परंतु यांत कौटुंबिक आदर्शांचा कांहीं प्रश्न गोवलेला नाहीं. अथवा कौटुंबिक आणि वैवाहिक जीवनाला द्यावी लागणारी किंमत शक्य तितकी कमी करण्याचा प्रयत्न आजची संस्कृति करीत नाहीं असेंही दाखविण्याची इब्सेनची इच्छा नाहीं. प्रो. रूबेक आणि त्याची पत्नी हें एक बदसूर जोडपें आहे यांत शंका नाहीं. परंतु हा शिल्पकार आणि त्याच्यासमोर 'नमुना' म्हणून उभी राहणारी मुलगी ( आयरीन ) यांच्या संबंधावर दिलेला भर पाहतां या नाटकांतील समस्या सामाजिक नसून सौंदर्यशास्त्रविषयक आणि मानसशास्त्रीयच आहे हें स्पष्ट होतें.

## दी क्विंटेसन्स ऑफ् इब्सेनिझम–त्याची पुरवणी

या ग्रंथांत वाङ्मयीन टीका अभिप्रेत नाहीं असा निर्वाळा स्वतः शॉनीं दिलेला असला तरी या ग्रंथाला इब्सेन संप्रदायाच्या नाटकाच्या तांत्रिक वैशिष्टयावर एक प्रकरण जोडलेलें आहे. शॉच्या मतें या नवनाट्याचीं तांत्रिक वैशिष्ट्यें 'चर्चा' आणि 'वास्तववादी प्रसंग' हीं आहेत. कलेंत वास्तववादाचें काय महत्त्व आहे आणि नाटकांत 'चर्चे'ला काय स्थान आहे याचा विचार आपण मागें केलाच आहे. या ठिकाणीं एवढेंच दाखवावयाचें आहे कीं इब्सेन-संप्रदायाच्या नाटकांतील चर्चेला शॉ अवास्तव महत्त्व देतात. इब्सेनच्या फक्त दोनच नाटकांत चर्चेनें बराच मोठा भाग व्यापला आहे. एक 'डॉल्स हाउस' आणि दुसरें 'व्हेन् वुइ डेड् अवेकन्'. 'घोस्ट्स्', 'रॉझमरशॉम' आणि 'जॉन् गॅब्रिअल बॉर्कमन्' यांतही चर्चा महत्त्वाची असली तरी ती प्रधान नाहीं. डॉल्स हाउसमधील विषयविवेचनाबाबतींतही पी. पी. हौवे ( Mr. P. P. Howe ) सारख्यांचें मत असें आहे कीं यांतील चर्चा ही केवळ चर्चेसाठीं म्हणून आलेली नाहीं.

बर्नार्ड शॉ इब्सेनच्या खऱ्या तांत्रिक नावीन्याचा उल्लेखच करीत नाहींत. हें नावीन्य म्हणजे 'पूर्वावलोकनात्मक पद्धत.' ( Retrospective Method ) यांत स्वभावप्रगटीकरण ( Exposition ) हा नाट्यक्रियांचा ( Action ) एक भागच असतो. याकडे शॉचें लक्ष वेधलेलें नाहीं. उलट, प्रचारक शॉ आपल्या आणि इब्सेनच्या नाटकांतील 'चर्चे'चें महत्त्व अवास्तव वाढवून ठेवतात असें दिसतें. नाट्यकथेचा विकास करणाऱ्या आणि स्वभावछटा स्पष्ट करणाऱ्या प्रक्रियेचा एक भाग म्हणून जेव्हां 'चर्चा' नाटकात येते तेव्हांच ती नाटकाचा एक आवश्यक घटक बनूं शकते ; एरवीं नाहीं हें शॉ विसरतात. इब्सेन आणि शेक्सपिअर यांच्यावरील शॉच्या टीकेंत अधूनमधून चांगल्या टीकेचे नमुने आहेत, शिवाय एकंदरींत टीका शॉची विचारसरणी पूर्णपणें स्पष्ट करणारी आहे यांत शंका नाहीं. तथापि ही टीका त्यांच्या वृत्तपत्र-व्यवसायाच्या आणि प्रचारकाच्या भूमिकेंतील अनेक पूर्वग्रहांनीं दूषित झाली आहे, असें म्हणावेंच लागतें !

— समाप्त —